**नैसर्गिक आपत्तीमुळे बाधीत शेतकऱ्यांना कर्जमाफी (राज्यस्तर) योजनेसाठी नवीन लेखाशिर्ष निर्माण करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग**
**शासन निर्णय क्र. कृकमा ०९१९/ प्र.क्र.१३७ /२-स**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १३ डिसेंबर, २०१९

**वाचा :-** १) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. कृकमा ०८१९/प्र. क्र. ११५ (भाग-३)/ २-स, दि २३.०८.२०१९.

२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. कृकमा ०८१९/प्र. क्र. ११५ (भाग-३)/ २-स, दि २७.०८.२०१९.

**प्रस्तावना :-**

राज्यात जुलै २०१९ ते ऑगस्ट २०१९ या कालावधीमध्ये अतिवृष्टीमुळे उद्भवलेल्या पूर परिस्थितीत बाधित झालेल्या आपदग्रस्तांना मदतीचा निर्णय घेण्याबाबत मा.मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली मंत्रिमंडळ उपसमिती गठीत करण्यात आली आहे. सदर समितीची बैठक दि.१९.८.२०१९ रोजी दुपारी २.०० वा. मा.मुख्यमंत्री यांचे अध्यक्षतेखाली संपन्न झाली. सदर बैठकीमध्ये राज्यात जुलै २०१९ ते ऑगस्ट २०१९ या कालावधीमध्ये अतिवृष्टीमुळे उद्भवलेल्या पूर परिस्थितीत बाधित झालेल्या जिल्हयातील बाधित शेतकऱ्यांचे पीक कर्ज माफ करण्याबाबतचा निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुषंगाने पूरग्रस्तांच्या कर्जमाफीसाठी शासन निर्णय दिनांक २३.०८.२०१९ व शासन निर्णय दिनांक २७.०८.२०१९ निर्गमित करण्यात आला.

राज्यस्तरावरील जुलै २०१९ ते ऑगस्ट २०१९ या कालावधीमध्ये अतिवृष्टीमुळे उद्भवलेल्या पूर परिस्थितीत बाधित झालेल्या जिल्हयातील बाधित शेतकऱ्यांचे पीक कर्ज माफ करण्यासाठी तसेच इतर नैसर्गिक आपत्तीने बाधित शेतकऱ्यांचे पीक कर्ज माफ करण्यासाठी "नैसर्गिक आपत्तीमुळे बाधीत शेतकऱ्यांना कर्जमाफी (राज्यस्तर) योजना" या योजनेवरील खर्चाकरीता नवीन लेखाशिर्ष निर्माण करावयाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

"नैसर्गिक आपत्तीमुळे बाधीत शेतकऱ्यांना कर्जमाफी (राज्यस्तर) योजना" या योजनेवरील खर्चाकरिता खालील प्रमाणे नवीन लेखाशिर्ष निर्माण करण्यास शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे :-

| | |
|---|---|
| मागणी क्रमांक व्ही - ०२<br>२४३५ - इतर कृषीविषयक कार्यक्रम<br>००<br>६० - इतर<br>१०१ - शेतकऱ्यांच्या कर्जमाफीसाठी योजना<br>(००)(०२) नैसर्गिक आपत्तीमुळे बाधीत शेतकऱ्यांना कर्जमाफी (राज्यस्तर)<br>(२४३५ ०१३३) | Demand No. V-२<br>२४३५ - Other Agriculture Program<br>००<br>६० - Other Expenditure<br>१०१ - Scheme for Debt relief to Farmers<br>(००)(०२) Loan waiver to Natural Calamity Affected Farmers (State Level)<br>(२४३५ ०१३३) |

२. या योजनेवरील खर्चासाठी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अधिनस्त अप्पर आयुक्त व विशेष निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच लेखाधिकारी, अधिन सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय, वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ ४३८/२०१९ दिनांक ३० /१०/२०१९ अन्वये व महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई अनौपचारीक संदर्भ क्र. ख.वि./चा-१ सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग/ यूओआर- १२५ /२०१९-२०/७९५, दिनांक १५ / ११/२०१९ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१९१२१३१८१८४९९१०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Ramesh Shankarrao Shingte

Digitally signed by Ramesh Shankarrao Shingte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Cooperation, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fed1b2ed6e1e4aca719170d9eae8aa251ee28dc56c75d8a65acb34103d45bd48, serialNumber=b9bf7a534d8f1272bd902482bf95b556a5baefdddce18574a78fa2d8d0957d1f, cn=Ramesh Shankarrao Shingte
Date: 2019.12.13 18:22:26 +05'30'

**( रमेश शिंगटे )**
अवर सचिव तथा सहनिबंधक,
सहकारी संस्था, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.

२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा ) महाराष्ट्र-१, मुंबई.

३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा ) महाराष्ट्र-२, मुंबई.

४) अधिदान व लेखा अधिकारी, पुणे.

५) निवासी न लेखापरिक्षा अधिकारी, पुणे.

६) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).

७) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (सर्व).

८) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व).

९) वित्त विभाग (अर्थसंकल्प-१३/ व्यय-२), / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०) अवर सचिव (कार्यासन १७-स), सहकार, पणन वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.

११) निवडनस्ती (कार्यासन २-स).